नागपूर मेट्रो रेल टप्पा-२ प्रकल्पाच्या अंमलबजावणीस सुधारित मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एनएमआर-३३१८/प्र.क्र.१४५/नवि-७,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १२ मे, २०२३.

संदर्भ:-

१) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक: एनएमआर-३३१८/प्र.क्र.१४५/नवि-७, दिनांक १४ जानेवारी, २०१९.
२) गृहनिर्माण व शहरी कार्य मंत्रालय, भारत सरकार यांचे K-१४०११/०६/२०१९-MRT, दिनांक २९.१२.२०२२ रोजीचे पत्र.

प्रस्तावना :-

नागपूर शहराची वाढती लोकसंख्या आणि वाहनांची संख्या या अनुषंगाने निर्माण झालेल्या वाहतुक समस्या लक्षात घेवून सार्वजनिक वाहतुक व्यवस्था सक्षम करण्याच्या दृष्टीने शासनाने माहे जानेवारी, २०१४ मध्ये नागपूर मेट्रो रेल टप्पा-१ प्रकल्प राबविण्यास मान्यता दिली. सदरच्या एकूण ४०.०२ कि.मी. लांबी व ३२ स्थानक असलेल्या प्रकल्पाची उभारणी महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. या एसपीव्ही कंपनीकडून करण्यात आली असून टप्पा-१ प्रकल्पाच्या संपूर्ण मार्गिकेचे दिनांक ११ डिसेंबर, २०२२ रोजी लोकार्पण करण्यात आले आहे.

नागपूर मेट्रो रेल टप्पा-१ मेट्रो मार्गिकेचा विस्तार करण्यासाठी टप्पा-२ अंतर्गत ४८.२९ कि.मी. लांबी व रु.११२३९ कोटी खर्चाच्या उन्नत मेट्रो मार्गिकेची महामेट्रोमार्फत अंमलबजावणी करण्यास संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक १४ जानेवारी, २०१९ अन्वये मान्यता देण्यात आली होती. सदरचा प्रकल्प खर्चाचा वित्तीय आराखडा “इक्विटी शेअरिंग मॉडेल"आधारे प्रस्तावित करण्यात आला असल्याने प्रकल्प प्रस्ताव केंद्र शासनाच्या मंजूरीसाठी पाठविण्यात आला होता. केंद्र शासनाने वेळोवेळी उपस्थित केलेले तांत्रिक व वित्तीय बाबी विचारात घेऊन टप्पा-२ मधील ५ वी मार्गिका: वासुदेव नगर ते दत्तवाडी या प्रकल्पामधून वगळण्यात आली असून प्रकल्प खर्चात देखील सुधारणा झाली आहे. दिनांक ०७.१२.२०२२ रोजी पार पडलेल्या केंद्रीय मंत्रीमंडळाच्या बैठकीमध्ये सदर प्रकल्पास रु. ६७०८ कोटी खर्चासह मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्यानुषंगाने गृहनिर्माण व शहरी कार्य मंत्रालयाने संदर्भाधीन दिनांक २९.१२.२०२२ रोजीच्या आदेशान्वये प्रकल्पाच्या अंमलबजावणीस मंजुरी प्रदान आहे.

केंद्र शासनाच्या मान्यतेच्या पार्वश्वभूमीवर सदर प्रकल्पास सुधारीत शासन मान्यता देणे आवश्यक आहे. सबब, संदर्भाधीन शासन निर्णय दि. १४ जानेवारी २०१९ अधिक्रमित करून सुधारित शासन निर्णय निर्गमित करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्यानुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

**शासन निर्णय :-**

नागपूर मेट्रो रेल टप्पा-२ प्रकल्पास केंद्र शासनाने दिलेल्या मंजुरीच्या पार्श्वभूमीवर संदर्भाधीन शासन निर्णय दि. १४ जानेवारी २०१९ अधिक्रमित करून सदर प्रकल्पाची महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. नागपूर यांच्यामार्फत अंमलबजावणी करण्यास पुढीलप्रमाणे सुधारीत मान्यता देण्यात येत आहे:-

१) नागपूर मेट्रो रेल प्रकल्प टप्पा-२ च्या करिता रू. ६७०८ कोटीच्या खर्चास व खालील मार्गिकांना मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | मार्गिका | फेज-२ मार्गिका | लांबी (कि.मी) | स्थानके |
|---|---|---|---|---|
| १ | उत्तर- दक्षिण | MIHAN ते MIDC ESR<br>(मार्गिका 1A - दक्षिण मार्गिकेचे विस्तार) | १८.६५ | १० |
| २ | उत्तर- दक्षिण | ऑटोमोटिव्ह चौक ते कन्हान नदी<br>(मार्गिका 2A -उत्तर मार्गिकेचे विस्तार) | १३.०० | १२ |
| ३ | पुर्व- पश्चिम | लोकमान्य नगर ते हिंगणा<br>(मार्गिका 3A-पश्चिम मार्गिकेचे विस्तार) | ६.६५ | ७ |
| ४ | पुर्व-पश्चिम | प्रजापती नगर ते ट्रान्सपोर्ट नगर<br>(मार्गिका 4A-पुर्व मार्गिकेचे विस्तार) | ५.५० | ३ |
| **एकूण** | | | **४३.८०** | **३२** |

२) सदर प्रकल्पासाठी सोबतच्या परिशिष्ट-१ मध्ये नमूद केलेल्या विविध संस्थांच्या वित्तीय सहभाग आराखड्यास मान्यता देण्यात येत आहे.

३) सदर प्रकल्पासाठी राज्य शासनाकडून रु.९९८.२० कोटी समभाग स्वरुपात त्याचप्रमाणे केंद्रीय करांच्या ५० टक्के रु. १९७ कोटी व बांधकाम कालावधी दरम्यानचे व्याजाकरिता रु. १५ कोटी असे एकूण रु. २१२ कोटी रक्कम बिनव्याजी दुय्यम कर्ज स्वरुपात महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. यांना वित्तीय हिस्सा उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४) सदर प्रकल्पासाठी रु. ३५८५.६० कोटी रक्कमेच्या मर्यादेत द्विपक्षीय/बहुपक्षीय कर्ज, सदर कर्जाची व्याजासह परतफेडीची जबाबदारी महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेडची राहील, या अटीवर घेण्यास मान्यता देण्यात येत आहे.

५) सदर प्रकल्पामध्ये महाराष्ट्र शासनाचा समभाग रु.९९८.२० कोटी तसेच केंद्रीय करांच्या ५० टक्के व बांधकाम कालावधी दरम्यानचे व्याज याकरिता रु.२१२ कोटी रक्कमेचे दुय्यम कर्ज या व्यतिरिक्त राज्य शासनावर कुठलेही प्रत्यक्ष तसेच अप्रत्यक्ष दायित्व येणार नाही.

६) सदर प्रकल्पाकरिता सोबतच्या परिशिष्ट-१ मध्ये नमूद केल्याप्रमाणे महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ (एमआयडीसी) व महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी (एमएडीसी) यांचेमार्फत प्रत्येकी रु. २८४ कोटी इतके अनुदान महामेट्रोला देण्यासाठी एमआयडीसी व एमएडीसी यांना निर्देश देण्यात येत आहेत.

७) मेट्रो सेवेसाठी खाली नमूद केल्यानुसार प्रवासी भाडे दरास तत्वतः मान्यता देण्यात येत आहे. या भाड्यामध्ये ठराविक कालावधीनंतर आवश्यकतेप्रमाणे सुधारणा करण्याचे अधिकार महामेट्रो कंपनीस देण्यात येत आहे.

| अ. क्र. | अंतर (कि.मी.) | डीएमआरसीचे सन २०१७-१८ चे भाडे (रू) | नागपूर मेट्रो रेल प्रकल्प फेज-२ चे सन २०२७-२८ चे प्रस्तावित भाडे (रू) |
|---|---|---|---|
| १ | ०-२ | १० | २० |
| २ | २-५ | २० | ४० |
| ३ | ५-१२ | ३० | ६० |
| ४ | १२-२१ | ४० | ८० |
| ५ | २१-३२ | ५० | १०० |

७) नागपूर मेट्रो रेल प्रकल्पाचा दुसरा टप्पा -महत्वाकांक्षी नागरी वाहतुक प्रकल्प' म्हणून घोषित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

८) मेट्रो रेल्वे कायदा, १९७८, मेट्रो रेल्वे कायदा, २००२, मेट्रो रेल्वे (सुधारणा) कायदा, २००९ आणि रेल्वे कायदा, १९८९ अंतर्गत अंमलबजावणीसाठी मान्यता देण्यात येत आहे.

९) महा-मेट्रो फेज-२ चे विस्तारीत मार्गिकेमध्ये येणारे क्षेत्र तसेच स्टेशन, पार्कींग व संपत्ती विकास याकरीता महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. ला हस्तांतरीत करण्यात आलेल्या क्षेत्रासाठी एसपीए (SPA) म्हणून मान्यता देण्यात येत आहे.

१०) महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ च्या अंतर्गत नागपूर मेट्रो रेल टप्पा-२ च्या पारगमन अभिमुख विकास (टीओडी) कॉरिडॉरचे विस्तारीकरण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

११) सदर प्रकल्प अंमलबजावणीच्या दृष्टीकोनातून धोरणात्मक निर्णय घेण्यासाठी शासनातर्फे परिशिष्ट-३ मध्ये नमूद खालील केल्याप्रमाणे प्रमाणे उच्चाधिकार समिती (High Power Committee) गठीत करून समितीच्या कार्यक्षेत्रास मान्यता देण्यात येत आहे.

१२) सोबतच्या परिशिष्ट-४ मध्ये नमूद केल्याप्रमाणे "समर्पित नागरी परिवहन निधी" च्या उभारणीस आणि इतर स्त्रोतामधून उपलब्ध झालेला निधी "समर्पित नागरी परिवहन निधी" मध्ये जमा करुन तो निधी सदर प्रकल्पासाठी घेतलेल्या कर्जाची परतफेड, कार्यान्वयन व देखभाल (O&M), भविष्यात येणाऱ्या पायाभूत सुविधा प्रकल्पांची अंमलबजावणी करण्यासाठी इ. साठी महामेट्रोने वापरण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१३) नागपूर व पुणे मेट्रो रेल्वे प्रकल्पांतर्गत येणाऱ्या प्रकल्प बाधितांचे (PAP) पुनर्वसन व पुनर्वसाहत करण्याकरिता गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक प्रकल्प-१७००/सीआर-३१/स्लम-२, दिनांक १२.१२.२००० अन्वये लागू केलेले “मुंबई नागरी परिवहन प्रकल्प पुनर्वसन व पुनर्वसाहत धोरण (MUTP- R & R Policy)” लागू करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१४) सदर प्रकल्पाच्या मंजूर प्रकल्प पुर्णत्व किंमतीमध्ये किंमतवाढ, चलन विनिमय दरांतील बदल, प्रकल्पाच्या व्याप्तीमध्ये बदल, डीपीआरमध्ये न दर्शविलेल्या आवश्यक बाबींचा समावेश, प्रकल्प उभारणीच्या विहीत मुदतीमध्ये वा त्यापुढे टाळता येणारा विलंब, अशा कारणांमुळे वाढ झाल्यास असा वाढीव खर्च स्थानिक प्राधिकरण, शासकीय/निमशासकीय संस्था त्यांच्याकडील जमिनी (डीपीआरमध्ये दर्शविलेल्या जमिनीव्यतिरिक्त) उपलब्ध करून घेऊन अशा जमिनीचे विकसन करून टीओडी, एफएसआय वा इतर अनुषंगिक माध्यमातून निर्माण होणाऱ्या आर्थिक स्त्रोतामधून भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१५) सध्या महानगरपालिका अधिनियम, १९६६ च्या कलम १४९-बी अंतर्गत नागपूर महानगरपालिका हद्दीमध्ये १% अधिभार आकारला जातो. सदर प्रकल्पाचे संरेखन विचारात घेता महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती कायदा, १९६१ मध्ये ही त्यानुषंगाने दुरूस्ती करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१६) सदर मेट्रो प्रकल्पाच्या मार्गिकेमध्ये तसेच मेट्रो स्थानकांमध्ये गरज वाटल्यास किरकोळ बदल करण्यास, प्रकल्पाच्या व्याप्तीमध्ये अथवा प्रकल्पाच्या खर्चात वाढ होत असल्यास त्यास शासनाची पूर्व मान्यता घेण्याच्या अटीवर, महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन (महामेट्रो) ला प्राधिकृत करण्यात येत आहे.

१७) सदर प्रकल्पाच्या खर्चात भूसंपादन, पुनर्वसन व पुनर्वसाहतीकरण यामधील विलंबामुळे वाढ होणार नाही याची महामेट्रोने दक्षता घ्यावी.

१८) सदर मेट्रो रेल प्रकल्पाच्या बांधकाम खर्चात अवाजवी वाढ होणार नाही याची दक्षता घेऊन प्रकल्पाची उभारणी पुढील ५ वर्षात करावी.

सदरचा शासन निर्णय नियोजन विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. २०/१४४४, दिनांक ०७/०२/२०२३ व वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. १८८, दिनांक ०८/०५/२०२३ अन्वये प्राप्त मान्यता व दिनांक ०५.०४.२०२३ रोजी पार पडलेल्या मंत्रिमंडळ बैठकीतील निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०५१२११५९४४४३२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: CN = VIJAY KARBHARI CHAUDHARI, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2023.05.12 18:22:32 +05'30'

**( विजय चौधरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र राज्य**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७. अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
९. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१०. अपर मुख्य सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
११. अपर मुख्य सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२. अपर मुख्य सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१३. अपर मुख्य सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१४. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१५. प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१६. प्रधान सचिव (परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१७. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१८. प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१९. सचिव (विशेष प्रकल्प), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२०. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२१. सचिव (वि.सु), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
२२. व्यवस्थापकिय संचालक, महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. (महामेट्रो) नागपूर.
२३. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी लि., मुंबई.
२४. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ लि., मुंबई.
२५. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
२६. पोलिस आयुक्त, नागपूर.
२७. सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर
२८. आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर.

२९. महानगर आयुक्त, नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, नागपूर.
३०. जिल्हाधिकारी, नागपूर.
३१. महाव्यवस्थापक, मध्य रेल्वे, मुंबई.
३२. विभागीय रेल्वे प्रबंधक, मध्य रेल्वे, नागपूर.
३३. विभागीय रेल्वे प्रबंधक, दक्षिण-पूर्व मध्य रेल्वे, नागपूर.
३४. महाव्यवस्थापक, नागपूर महानगर परिवहन महामंडळ मर्यादित, पुणे.
३५. सह सचिव, नगर रचना, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३६. संचालक, नगर रचना, मध्यवर्ती प्रशासकीय इमारत, पुणे.
३७. उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३८. कार्यासन अधिकारी (नवि-२६), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३९. निवड नस्ती (नवि-७).

**परिशिष्ट-१**

**नागपूर मेट्रो रेल टप्पा-२ प्रकल्प किंमतीचा वित्तीय आराखडा पुढीलप्रमाणे आहे:-**

| अ.क्र. | तपशील/संस्था | आर्थिक सहभाग निधी (रु. कोटी) | आर्थिक खर्चातील हिस्सा (रु.कोटी) |
|---|---|---|---|
| १ | केंद्र शासनाचा समभाग | ९९८.२० | १६.७३% |
| २ | महाराष्ट्र शासनाचा समभाग | ९९८.२० | १६.७३% |
| ३ | राज्य शासनाकडून केंद्रीय कराकरीता दुय्यम कर्ज | १९७.०० | ३.२७% |
| ४ | केंद्र शासनाकडून केंद्रीय कराकरिता दुय्यम कर्ज | १९७.०० | ३.२७% |
| ५ | द्विपक्षीय/बहुपक्षीय वित्तीय संस्थांकडून कर्ज | ३५८५.६० | ६०.००% |
| **६** | **एकूण प्रकल्प पूर्णत्वाचा खर्च (जमीन, पुनर्वसन व पुनर्वास आणि पीपीपी खर्च वगळून) (अ)** | **५९७६.००** | **१००%** |
| ७ | एमआयडीसीमार्फत Value Capture Funding (VCF) मध्ये जमा झालेल्या निधीतून प्रकल्प खर्चासाठी योगदान | ५०.०० | |
| ८ | एमएडीसीमार्फत राज्य कराकरीता VCF मध्ये जमा झालेल्या निधीतून प्रकल्प खर्चासाठी अनुदान | २८४.०० | |
| ९ | एमआयडीसीमार्फत भुसंपादन, पुनर्वसन व पुनर्वसाहत आणि राज्य कराकरीता VCF मध्ये जमा झालेल्या निधीतून प्रकल्प खर्चासाठी अनुदान | २३४.०० | |
| १० | बांधकाम कालावधी दरम्यानचे व्याजाकरिता (द्विपक्षीय/बहुपक्षीय वित्तीय संस्थांकडूनच्या कर्जावरील व्याज) राज्यशासनाकडून दुय्यम कर्ज. | १५.०० | |
| ११ | पीपीपी घटक | १४९.०० | |
| **१२** | **एकूण (ब) (अनु. ७ ते ११)** | **७३२.००** | |
| | **एकूण प्रकल्प किंमत (अ+ब)** | **६७०८** | - |

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: CN = VIJAY KARBHARI CHAUDHARI, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2023.05.12 18:22:49 +05'30'

**( विजय चौधरी )**

**उप सचिव, महाराष्ट्र राज्य**

## परिशिष्ट-२
## प्रकल्प किंमतीचा सविस्तर तपशील

| अ.क्र. | तपशील | खर्च (रु.कोटी) |
|---|---|---|
| १ | मार्ग आखणी व रचना | १,६५६ |
| २ | स्टेशन इमारती | ८५५ |
| ३ | डेपो | १८३ |
| ४ | ट्रॅकचा खर्च (पी-वे) | ३१२ |
| ५ | वीज पुरवठा व विद्युतीकरण | ३८० |
| ६ | सिग्लन व संपर्क नियंत्रण | ४२५ |
| ७ | पर्यावरण खर्च | १२ |
| ८ | पूरक स्थापत्य सुविधा व अन्य तांत्रिक खर्च | २६२ |
| ९ | सुरक्षेवरील भांडवली खर्च | १२ |
| १० | कर्मचारी क्वार्टर व इमारती | ७१ |
| ११ | इंटर मॉडेल इंटिग्रेशन वरील भांडवली खर्च | ९६ |
| १२ | रोलींग स्टॉक | ३८४ |
| **१३** | **जानेवारी, २०१९ किंमत स्तरावरील एकूण किंमत (जमीन, आर अँड आर, पीपीपी, आयडीसी, सामान्य शुल्क, आकस्मिकता, केंद्रीय आणि राज्य कर वगळून) (एकूण १ ते १२)** | **४,६४८** |
| १४ | जमीन वगळता सर्व वस्तूंवर @ ५% सामान्य शुल्क | २३२ |
| १५ | जमीन वगळता सर्व वस्तूंवर @ ३% आकस्मिकता शुल्क | १४६ |
| **१६** | **जानेवारी-२०१९ किंमत पातळीसह एकूण किंमत. सामान्य शुल्क आणि आकस्मिकता (जमीन, आर अँड आर, पीपीपी, आयडीसी, केंद्रीय आणि राज्य कर वगळून) (एकूण १३ ते १५)** | **५,०२७** |
| १७ | आकस्मिकता शुल्क वगळता सर्व वस्तूंवर ५% दराने वाढ | ६०७ |
| **१८** | **एकूण खर्च समावेश. सामान्य शुल्क, आकस्मिकता, वाढ, (जमीन, R&R, PPP, IDC, केंद्रीय आणि राज्य कर वगळून) (एकूण १६ ते १७)** | **५,६३४** |
| १९ | केंद्रीय GST आणि मूलभूत सीमा शुल्क | ३५० |
| २० | ५% दराने केंद्रीय कर आणि मूलभूत सीमा शुल्कांवर वाढ | ४४ |
| **२१** | **एकूण खर्च समावेश. सामान्य शुल्क, आकस्मिकता, वाढ, केंद्रीय कर (जमीन, R&R, PPP, IDC, राज्य कर वगळून) (एकूण १८ ते २०)** | **६,०२८** |
| २२ | राज्य GST (५% वाढ सह) | ३५५ |
| २३ | भुसंपादन खर्च | १५० |
| २४ | पुनर्वसन/पुनर्वास खर्च | १३ |
| २५ | पीपीपी घटक | १४९ |
| २६ | बांधकाम कालावधी दरम्यानचे व्याज | १५ |
| | **सर्व करांसह एकूण प्रकल्प किमत** (एकूण २१ ते २५) | **६७०८** |

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: CN = VIJAY KARBHARI CHAUDHARI, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2023.05.12 18:23:09 +05'30'

**( विजय चौधरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र राज्य**

## परिशिष्ट-३

## उच्चाधिकार समितीची रचना व कार्यकक्षा

**अ. उच्चाधिकार समितीची रचना :-**

प्रकल्प अंमलबजावणीच्या दृष्टीकोनातून धोरणात्मक निर्णय घेण्यासाठी शासनातर्फे खालीलप्रमाणे उच्चाधिकार समिती (High Power Committee) स्थापन करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| अध्यक्ष | : | मा. मुख्य सचिव |
| सदस्य | : | अपर मुख्य सचिव(नवि-१), नगर विकास विभाग |
| सदस्य | : | प्रधान सचिव(नवि-२), नगर विकास विभाग |
| सदस्य | : | प्रधान सचिव, वित्त विभाग. |
| सदस्य | : | प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग |
| सदस्य | : | जिल्हाधिकारी, नागपूर |
| सदस्य | : | आयुक्त, नागपूर महानगर प्रादेशिक विकास प्राधिकरण |
| सदस्य | : | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन(महामेट्रो), नागपुर |

**ब. सदर समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील :-**

१) नागपूर मेट्रो फेज-२ उभारणे व परिचलन करणे या संबंधातील धोरणात्मक बाबींवर निर्णय घेणे.

२) नागपूर मेट्रो रेल प्रकल्पाच्या फेज-२ संदर्भात जमीन वापर बदल, वाढीव चटई क्षेत्र निर्देशांक व तद्नुषंगिक सवलती देण्यासंदर्भात निर्णय घेणे.

३) नागपूर मेट्रो रेल प्रकल्पाच्या फेज-२ ला राज्य शासनाचा देय हिस्सा वितरित करण्यासाठी निर्देश देणे.

४) नागपूर मेट्रो रेल प्रकल्प फेज-२ च्या सविस्तर प्रकल्प अहवालात नमूद केल्याप्रमाणे अथवा आवश्यकतेप्रमाणे इतर आर्थिक पर्यायाच्या अंमलबजावणीसाठी निर्देश देणे व त्यासाठी कालबध्द कार्यक्रम ठरवून देणे.

५) राज्य शासनास वाटतील असे तसेच स्पेशल पर्पज व्हेईकल कंपनीच्या अखत्यारित नसलेल्या बाबींवर निर्णय घेणे.

६) केंद्र व राज्य शासनाने वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार नागपूर मेट्रो प्रकल्प फेज-२ मध्ये आवश्यक त्या सुधारणा/ बदल करून अंमलबजावणीस मान्यता देणे.

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: CN = VIJAY KARBHARI CHAUDHARI, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2023.05.12 18:23:27 +05'30'

**( विजय चौधरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र राज्य**

## परिशिष्ट-४

**नागपूर मेट्रो टप्पा-२ प्रकल्पासाठी निधी उभारण्याचे विविध स्त्रोत:-**

सदर प्रकल्पाकरीता इतर निधी उभारण्याचे स्रोत खालीलप्रमाणे प्रस्तावित करण्यात येत आहेत:-

१) मेट्रो मार्गिकांच्या दोन्ही बाजूस ५०० मी. अंतरापर्यंत येणाऱ्या जमिनीवर, अधिमूल्य आकारुन ४ चटईक्षेत्र निर्देशांकाच्या मर्यादेत अतिरिक्त चटईक्षेत्र निर्देशांक (एफ.एस.आय.) देण्याची तरतूद विकास नियंत्रण नियमावलीत करुन त्यानुसार अधिमूल्याची रक्कम संबंधित क्षेत्रातील नियोजन प्राधिकरणाने वसूल करणे व त्यापैकी ५० % रक्कम पायाभूत सुविधांच्या सुधारणांसाठी स्वतःकडे ठेवून उर्वरित ५०% रक्कम सदर प्रकल्पासाठी नियुक्त एसपीव्ही यांस देणे.

२) शासन अधिसूचित करेल असे महत्वपूर्ण नागरी वाहतूक प्रकल्प राबविण्यात येणाऱ्या शहरात महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ च्या तरतूदींनुसार आकारण्यात येणारे विकास शुल्क १००% पर्यंत वाढ करून आकारण्याविषयी कायद्यातील तरतूद करणे व त्यानुसार वसूल होणारी वाढीव रक्कम अशा प्रकल्पासाठी वापरणे.

३) शासन अधिसूचित करेल असे महत्वपूर्ण नागरी वाहतूक प्रकल्प राबविण्यात येणाऱ्या महानगरपालिका क्षेत्रात मुंबई मुद्रांक अधिनियम, १९५८ अन्वये स्थावर मालमत्तेचे अनुक्रमे विक्री, देणगी व फलोपभोग गहाण यावरील संलेखावर बसावयाच्या मुद्रांक शुल्कासोबतच जमिनी व इतर स्थावर मालमत्तेचे विक्री किंवा देणगीच्या बाबतीत अशा रितीने स्थित असलेल्या मालमत्तेच्या मुल्यांवर व फलोपभोग गहाणाच्या संलेखाच्या बाबतीत संलेखात मांडण्यात आलेल्या संलेखाद्वारे सुरक्षित रक्कमेवर १% अधिभार लावण्याची तरतूद महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमात करून अशा प्रत्यक्ष जमीनी व इतर स्थावर मालमत्तेचे अनुक्रमे विक्री, देणगी व फलोपभोग गहाण संलेखाच्या नोंदणीच्या वेळी सदर अधिभाराची रक्कम संबंधित जिल्हा उपनिबंधकांनी वसूल करणे व शासनाने यामध्यमातून वसूल झालेल्या रक्कमेएवढे अनुदान महत्वपूर्ण नागरी वाहतूक प्रकल्पासाठी नियुक्त अंमलबजावणी संस्थेस देणे.

४) मेट्रो रेल्वे स्टेशन व कार डेपोंच्या जागेंचे व्यावसायिक वापरास परवानगी देणे व त्यानुसार विक्सनाद्वारे प्राप्त होणारे उत्पन्न प्रस्तुत प्रकल्पासाठी वापरणे.

५) मेट्रो रेल्वे स्टेशन येथील जाहिरात व पार्कींगपासून मिळणारे उत्पन्न सदर प्रकल्पासाठी वापरणे.

उपरोक्त नमूद विविध स्त्रोतांमधून प्राप्त होणारा निधी "समर्पित नागरी परिवहन निधी" मध्ये जमा करुन तो निधी सदर प्रकल्पासाठी घेतलेल्या कर्जाची परतफेड, कार्यान्वयन व देखभाल (O&M), भविष्यात येणाऱ्या पायाभूत सुविधा प्रकल्पाच्या अंमलबजावणी करण्यासाठी इ. साठी महामेट्रोने वापरण्यास मान्यता देण्यात येत आहे.

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: CN = VIJAY KARBHARI CHAUDHARI, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2023.05.12 18:23:42 +05'30'

**( विजय चौधरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र राज्य**

*********